**सेवाग्राम विकास आराखडा जिल्हा वर्धा अंतर्गत विकास कामांचा आढावा घेऊन मा. पालकमंत्री वर्धा यांना अहवाल सादर करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## नियोजन विभाग

**शासन आदेश क्रमांक: सेविआ २०१८ /प्र.क्र. ७१/का.१४४४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक : ७ सप्टेंबर, २०१८.

**वाचा:** १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.तीक्षेवि २०१५ /प्र.क्र.६ /का.१४४४, दिनांक ४ जून, २०१५.

२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.सेविआ २०१३/प्र.क्र.१७/ का. १४४३ दिनांक ०१ ऑक्टोबर, २०१६.

**प्रस्तावना :-**

१) महात्मा गांधी यांच्या जयंतीस दि.२ ऑक्टोबर,२०१९ रोजी १५० वर्षे पूर्ण होत असल्याने सेवाग्राम विकास आराखडा, जिल्हा वर्धा परिसरात पायाभूत सुविधा उपलब्ध करण्यासाठी सेवाग्राम विकास आराखड्यास नियोजन विभाग शासन निर्णय दिनांक १ ऑक्टोबर, २०१६ अन्वये रु. १४४९९.७५ लक्ष इतक्या किंमतीच्या विकास आराखड्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

२) सेवाग्राम विकास आराखडा दि. २ ऑक्टोबर, २०१९ पर्यंत पूर्ण होणे आवश्यक आहे. यापार्श्वभूमीवर मा. मंत्री (वित्त व नियोजन) तथा पालकमंत्री, वर्धा यांनी दि. ६ सप्टेबर, २०१८ रोजी घेतलेल्या आढावा बैठकीत सदर आराखड्याचे कामकाज समाधनकारक नसल्याचे निदर्शनास आले आहे. या अनुषंगाने पुढील आदेश देण्यात येत आहेत.

**शासन आदेश-**

१) सेवाग्राम विकास आराखडा, जिल्हा वर्धा परिसरात पायाभूत सुविधा उपलब्ध करण्यासाठी शासन मंजूर सर्व कामे दि. २ ऑक्टोबर, २०१९ पर्यंत पूर्ण होणे आवश्यक आहे. या अनुषंगाने जिल्हाधिकारी वर्धा यांनी सेवाग्राम विकास आराखड्यातील प्रत्येक कामांचा दर १५ दिवसांनी स्थळ पाहणी करावी व सर्व समावेशक आढावा घ्यावा.

तद्नंतर संदर्भाधीन शासन निर्णयानुसार गठित जिल्हास्तरीय समितीचे अध्यक्ष मा.मंत्री (वित्त व नियोजन) व पालकमंत्री वर्धा यांच्याकडे सदर अहवाल पुढील तीन दिवसात सादर करावा.

२) जिल्हाधिकारी वर्धा हे सेवाग्राम विकास आराखडया करीता कार्यरत जिल्हा नियोजन अधिकारी,वर्धा व जिल्हास्तरीय सर्व संबंधित अधिकारी यांच्याकडून या विकास आराखडयामध्ये अंतर्भूत सर्व कामे विहित वेळेत पूर्ण करवून घेण्याकरीता संपूर्णपणे जबाबदार राहतील. यामध्ये दिरंगाई आढळून आल्यास विभागीय आयुक्त, नागपूर तथा संनियंत्रण अधिकारी यांनी संबंधितांवर शिस्तभंग विषयक कारवाई करण्याकरीता शासनास प्रस्ताव सादर करावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र २०१८०९०७१६५६३७६६१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vidya Hampayya

Digitally signed by Vidya Hampayya
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, cn=Vidya Hampayya
Date: 2018.09.07 17:02:45 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
उप सचिव

**प्रत तातडीच्या कार्यवाहीसाठी**
विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
जिल्हाधिकारी, वर्धा.

**प्रति,**

१) मा.मंत्री (वित्त व नियोजन) तथा पालकमंत्री जिल्हा वर्धा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.राज्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव.
३) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई.
५) निवडनस्ती का.१४४४, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.